


"**जीवन**" या ई-पुस्तक रसिकांच्यासाठी सादर करताना अत्यंत आनंद होत आहे...

महाराष्ट्रातील मान्यवर नवकवी हे विविध प्रकारचे लिखाण करीत आहेत, त्यावर त्यांचा अभ्यासही चालू आहे, त्याच्या या प्रयत्नांना हातभार लागावा म्हणून आम्ही ई-बुक साप्ताहिक स्वरुपात त्यांचे साहित्य आपल्यासाठी घेऊन आलो आहोत.. आपल्याला आवडतील अशा प्रकारच्या दर्जेदार काव्यरचना वाचायला मिळतील, याची खात्री आम्ही देतो...

कवी/कवयित्री यांनी ज्या काव्यरचना आम्हाला पाठविण्यात आल्या आहेत त्या त्यांनी स्वतः लिहिलेल्या आहेत, जर कोणाला काव्यरचनेवर आक्षेप असेल तर, त्यांनी bhargavidesign@gmail.com वर आम्हला सूचित करावे..

धन्यवाद,
भार्गवी डिजाईन स्टुडिओ



# जीवन.. असेही.. तसेही..

**श्री. संजय विष्णु जाधव**
शहापूर, जिल्हा - ठाणे

जीवन फुलले माझे
जीवन बहरले माझे
जीवन झाले धन्य माझे
जीवन झाले आनंदी माझे

पूर्व जन्माचे संचित जणू
स्वतःला धन्य मी मानतो
मिळाला जन्म या भूमीत
मन मायबापाचे जाणतो

केले संस्कार आजोबांनी
बाळकडू संस्कारांचे पाजले
बालपण माझे घडत गेले
जीवनाचे सूर ते जुळले

न धरावा हव्यास कशाचा
मिळेल त्यात समाधान मानावे
कष्ट करूनी धन कमवावे
जीवनात सदा आनंदी रहावे

घेतला वसा टाकू नये
चांगली सवय मोडू नये
रिकाम टेकड बसू नये
कुणास नावे ठेवू नये

दिली शिकवण साऱ्यांनी
जीवन माझे घडत गेले
भावनांची जडण घडण झाली
जीवन माझे फुलू लागले





**श्री. राजेंद्र उदारे**
पाथर्डी . जि. अहमदनगर

# जीवन.. असेही.. तसेही..

जन्मापासुन मरे पर्यंतचा प्रवास
जीवन असतेच बिनबुडाचं मडके
मनाप्रमाणे होई कधी मनाविरूध्द
कधी सुख तर दुःखा कडे लुंडके

बालपणी हट्ट पुरवी कधी पडे मार
शिक्षणात यश कधी अपयश हार
पैसा मिळे कष्टाने कधी हुशारीनेही
संसार फुले कधी कार्टकचेरी फार

मुलं मोठे होता शिक्षणाची चिंता
शिकती काही तर बुडवतेही कैक
सुन जावई भले कधी छळती सारे
मानसन्मान मिळे कधी बसे चपराक

सहल छान कधी चालताना हालं
सनसुद आंनदाने कधी फजीती
पाचपक्वान्न कधी उपाशीपोटी
चनवीन कपडे कधी जुने घालती

सुखात हासु कधी दुःखात आसू
प्रेमात झोका कधी मिळतो धोका
सज्जन भेटे कधी भेटतसे लबाड
हातचे जाते कधी तरी मिळे मोका

जीवन चित्रपट कधी असे नाटकं
मुखवटे खरे कधी रंगरंगोटीचेही
आहे त्यात समाधान मानायचे बरं
कारण जीवन खरचं असेही तसेही





**श्रीम. जया वि.घुगे-मुंडे**
परळी वैजनाथ, बीड

# जीवन.. असेही.. तसेही..

हा प्रवास नसतोच मुळी सोपा
कधी खडतर मार्गास धरून,
एका टप्प्यावर मग होतसे किती
दमछाक जबाबदारी पार करून...

किती अनुभवांनी दिले सुखद
अनपेक्षितपणे हवेहवेसे धक्के,
किती अंतरंगांनी दुखवूनी ऱ्हदय
मनास कणखर आणि पक्के...

आपले म्हणून ज्यांना सर्वस्व
अर्पिले होते मी निरपेक्षपणे,
न पुसणारे घालूनी घाव त्यांनीच
लुबाडीले सर्वस्व सापेक्षपणे...

वेदनांचा गावच मनाच्या एका
गाभाऱ्यात वसविला जीवनात,
तरी फुल होऊन सुगंध पेरला
क्षणोक्षणी सर्वांच्याच आयुष्यात...

जीवनाच्या या प्रवासात खूप
शिकले आणि शिकवले धडे,
पुन्हा नाही येणार क्षण गेलेले
ध्यान देते सकारात्मकतेकडे...

आसू-हसू,सुख-दु:ख येणे-जाणे
तटस्थ ,खंबीर लाभे क्षण जगणे,
कोण सर्व सुखी ध्यानी धरूनी
जीवनक्षण सार्थकी लावणे...






श्रीम. कल्पना सं गायकवाड

लवादा, ता.धारणी, जि.अमरावती


# जीवन.. असेही.. तसेही..

जिवन जिवन म्हणजे काय असतं
कधी तुझ्या तर कधी माझ्या
जिवनात येणाऱ्या सुख दुःखाचा
आंबट-गोड अनुभव असतं

जिवन जिवन म्हणजे काय असत
पंख लावून उंच भरारी घ्यायची
कि पंख छाटून जगायचं
आपले आपनच ठरवायच असतं

जिवन जिवन म्हणजे काय असतं
गजरा होऊन केसात मळायचं
कि फुल होऊन पायावर वाहायचं असतं
आपले आपणच ठरवायचं असतं

जिवन जिवन म्हणजे काय असतं
सुंदर अस स्वप्नाचं गाव असतं
नातीगोती प्रेम,जिव्हाळा असतं
किती प्रेम द्यायचं नी किती घ्यायचं
आपले आपनच ठरवायचं असतं

जिवन जिवन म्हणजे काय असतं
जगण्याला श्वास असतं
मरणाला स्मशान असतं
जगण्यासाठी मरावे कि
मरुन जगायचं असतं
आपले आपनच ठरवायचं असतं

जिवन जिवन म्हणजे काय असतं
थोड तुझ थोड माझ मानले
तर दुःख नाही तर सुखच सुख असतं






**श्रीम. उषा ढगे**

**ठाणें**


# जीवन.. असेही.. तसेही..

जीवनप्रवाही या आपण
जित जीवित मनुज सारे
कुणीच नसते पूर्णोचित
नच लायकपात्र ना पूर्तपूरे...

जगता जगता भोगूनी
कितीक ते प्रयास सारे
अन चुकता चुकतांना
धडपडून पुन्हां सावरणारे...

आखीव जीवनाच्या परिघास
उपरी रेषा अंतरंगास स्पर्शिते
आपण आपुले-से समजतांना
नकळत आम्हीं आमुचे होऊन जाते...

अभिलाषी मनाने जे कल्पिले
मांदुळले नि हरूनी हिरमुसले
प्रेम विरमले कृश मलीन झाले
संदिग्ध होऊन हरवूनही गेले...

कधी लालसेने खुळे मन
अवांतर जंगी त्या अधीरले
परी निग्रही राहूनी संयत
सत्वरी परत्वे तयासी थोपले...

परम ईशाच्या दिव्य कृपेने
संवर्ध कल्पतरूही उमपले
छायेखाली त्यांच्या वसता
सारे रसज्ञ सुखमय झाले..!





**श्रीम. सारिका सुहास वाणी**
सारूमन.
घणसोली, नवी मुंबई.

# जीवन.. असेही.. तसेही..

अंतरीचा श्वास आहे, जगण्याचा चान्स आहे..
पुढचे ठाऊक नाही, जीवन या क्षणी आहे..||धृ||

उत्सवाचा जल्लोष, जल्लोषात मदहोष आहे..
कधी आनंदी तर कधी असहाय्य शोक आहे..
सुखदु:खांचा खेळ जणू, ऐसे जीवन आहे..||1||

यशाचे आहेत किस्से, अपयशांचाही त्यात हिस्सा आहे..
कधी हारणे, कधी जिंकण्याचा भरवसा आहे...
संघर्षमय प्रवास जणू, ऐसे जीवन आहे...||2||

कधी स्वकीयांचा भास, कधी परकीयांचा संग आहे..
कधी अनपेक्षीत रंग, कधी अपेक्षाभंग आहे..
अनुभवांची शिदोरी जणू, ऐसे जीवन आहे....||3||

गर्द काळोखातही आशेचा किरण आहे..
याच क्षणी घेऊ भरारी, मग क्षणाची उड्डाण आहे...
क्षणाक्षणांची शृंखला जणू, ऐसे जीवन आहे..||4||





श्रीम. शलाका संजीव पाठक
कोथरूड, पुणे.

# जीवन.. असेही.. तसेही..

मनुजा, दिले देवाने तुजला
हे जीवन सुंदर आहे
प्रत्येक मौल्यवान क्षण
नजरेतून अनुभवून पाहे

सृजनता व दातृत्वाचे
निसर्गातून घे तू धडे
एकदा तरी कर जुळव
शीश झुकत देणा-यांकडे

मोहमाया पाश सारे
कवटाळून नको घेऊस
दुःख, क्लेश यातील
अलंकार नको लेऊस

आस्वाद घेताना जीवनाचा
स्मरण असु दे ईश्वराचे
जडणघडण ही त्याची करणी
नाही चालत इतर कोणाचे

जीवनातील आनंद घेतांना
जाणून घे त्यातील खरे मर्म
आयुष्याच्या हिशोबात घडू दे
एकदाच काहीतरी चांगले कर्म





**श्रीम. सुचिता मेहेंदर्गे**
**बोईसर.**

# जीवन.. असेही.. तसेही..

असेच रोज चाले...
सुख दुखांचे इथे ऋतू
पावसाच्या त्या सरी
मधून असा धूमकेतू

जीवन माझे असे
इथे क्षणक्षण वेचते
घेते उंच भरारी
परि आनंदाने जगते

रंगात रंग भरते
शब्दात मन गुंतवून
लेखणीशी बोलते
गूज जिवनाचे  सांगून

साध्य होण्यासाठी या
पाउले साथ चालताना
दमछाक होते च
स्वप्नपूर्ती ही करताना

काव्य बत्तीशी 7\9\7\9





**श्रीम. वृन्दा दीपक राव**
**धुळे.**

# जीवन.. असेही.. तसेही..

अळूच्या पानावर चमकणारा पाण्याचा थेंब
इतका अलगद निसटावा की पानालाही कळू नये..
जीवन असं असावं।।1।।

निशिगंधानें फुलून फुलावे सुगन्धाचे चंद्रधुमारे
फुलं कोमेजल्यानंतरही
सुगंधा ची पखरण होतच राहावी..
जीवन असं असावं।।2।।

वाळूनही गंध देते ती बकुळ पुष्पमाला

काळीजकप्प्यात कुणी जपलेली
जप करी कुणी प्रेमवेडा..
जीवन असं असावं।।3।।

कल्पवृक्ष  साऱ्यांसाठी
आला घेऊन विसावा
सेवेत रमून जगता
जन्म सार्थकी व्हावा..
जीवनअसं असावं।।4।।

चंदनी धूप देवघरात
जाळून स्वतःला घेतो पण
सुगंध लकेरीच साऱ्यांना देतो..
जीवन तसं असावं।।5।।

सुखदुःखाची करताना
बेरीज वजाबाकी
ताळ्यात उत्तर शोधता शून्य नसावा शेवटी..
असं जीवन असावं।।6।।





**श्रीम. वर्षा फटकाळे वराडे**
ठाणे.

# जीवन.. असेही.. तसेही..

नित्य नवे आयुष्य, सुखाने उजळावे
सोनेरी नाते हे, प्राजक्ता परी खुलावे
धरती, आकाश, सृष्टीवर रंग प्रेमाचे उधळावे
जीवन गाणे गातच रहावे

देह चंदन उगाळून, आयुष्य सुवासिक व्हावे
काम, क्रोध, मोह, मत्सर दूर सारुनी चालावे
अव्यक्त भावनांना ही बोल नवे द्यावे
जीवन गाणे गातच रहावे

असावा प्रवास मैत्रीच्या खोडकर वाटांचा
अनुभवांनी मात्र यशाचे गमक शोधावे
सिंचन करुनी प्रेमाचे, नात्याचे रोप जपावे
जीवन गाणे गातच रहावे

सुखाचा कळस गाठण्या, दुःखाच्या पायऱ्या चढावे
ध्येय जीवनाचे गाठण्या, नेहमी प्रयत्नशील रहावे
कोणी नसेल जरी आपले आपण सर्वांचेच व्हावे
जीवन गाणे गातच रहावे

रीती ओंजळ दिसता कुणाची, सुख त्यात भरावे
बाल्य, तारुण्य, वृद्धत्वाकडे, प्रसन्न चित्ते पहावे
छोट्याश्या या आयुष्यामध्ये, क्षणोक्षणी जगूनी घ्यावे
जीवन गाणे गातच रहावे





**श्रीम. मिरा कुलकर्णी**
**पिंपरी चिंचवड पुणे.**

# जीवन.. असेही.. तसेही..

आयुष्याच्या वळणावरून
हळूच मागे पाहिलं
क्षणात वाटलं मनाला
बरच करायचं राहिलं
लहान भावंडांना सांभाळत
बालपण हळूच सरलं
बिनधास्त खेळण्याचं
स्वप्न माझं विरलं
काही अपरिहार्य कारणांमुळे
शिक्षण अर्धवट राहिलं
लग्नाचं वय झालं म्हणून
लग्न करून दिलं
लग्न झाल्यावर काय
लवकरच पाळणा हलला
घरच बाळाचं करण्यात
दिवस जाऊ लागला
हळू हळू तरुणपणही
हातातून निसटून गेलं
मुलांच शिक्षण करण्यात
मन रमून गेलं
बघता बघता मुलं
मोठी कधी झाली
कळलंच नाही कधी
स्वतः कमावू लागली
देवा त्यांच्या अपेक्षा
तू नक्की कर पुर्ण
माझं आता काय राहिलं
झालं शरीर जीर्ण
डोळे आहेत तोवर
पाहून घ्यावं
कान आहेत तोवर
ऐकुन घ्यावं
पाय चांगले आहेत
तोवर फिरत रहावं
आवाज बरा आहे
तोवर गावून घ्यावं
असचं काहीसं
लक्षात मी ठेवलय
उरलेलं आयुष्य मजेत
घालायचं ठरवलंय





**श्रीम. रोहिणी टाकळकर जोशी**
**श्रीक्षेत्र नासिक.**

# जीवन.. असेही.. तसेही..

असे जीवनी घडावे
रम्य या स्वप्नी गुंतावे
चालतां अडखळत
धप्पदिशी ते पडावे..

सुगंधित त्या मैफिली
चांदराती पौर्णिमेला
हळव्या शपथा घ्याव्या
मोह त्या अनुरागाला ...

श्यामरंगी ती विरक्त
भावतरंगी रंगते
आरक्त पश्चिमा तिज
अनुरक्त ही भासते...

दु:ख भोगावं एकांती
येता आनंद सोहळा
हीच मानसाची ज्ञाती
एकत्र तो गोतावळा ...

काटा सलतो हृदयी
होऊ नये तो नायटा
कुटुंब हे असूनही
मनुष्य मनी एकटा...

एक जिवलग कुठे
फाफट पसारा सारा
यंत्र मानव जगतो
माझ्यासाठी कोण खरा.






**श्रीम. करिश्मा महेश डोंगरे**

**पंढरपूर.**


# जीवन.. असेही.. तसेही..

एखाद्या व्यक्तीला दु:ख देऊन
स्वत:साठी सुख मागू नका
रोज एखाद्या व्यक्तीला
क्षणभर आनंद देऊन बघा..

दुसर्यांना तुम्ही आनंदी ठेवा
तुम्हाला सुख नक्कीच मीळेल
कष्ट ईतके करा की,
गरिबी पळून जाईल..

हसणं असे ठेवा की
दुश्मन जळून जाईल
कोणी कीतीही घाव घालूदे
तरी मायेची सावली देईल..

राहनीमानावरून कधीचं तुम्ही
मैत्री करू नका
कपड्याच्या किंमतीवरून
कधीच किंमत करू नका..

हात जोडून सांगते तुम्हाला
जग प्रेमानेच जिंका नेहमी
द्वेश कधीच कामी येत नाही
तीरस्कार हा करा जरा कमी..

शेवटी पापाचं झुकते नेहमी
पुण्याला मुजरा करते मानाचा
हेच तर जीवन आहे मानवा
संदेश समजून घे जरा आमचा..





**श्रीम. मंदाकिनी क्षीरसागर**
**बीड.**

# जीवन.. असेही.. तसेही..

जीवन म्हणजे विविधतेने
नटलेले आगर..
सुखदुःखाच्या रंगीबेरंगी
पाण्याने भरलेली घागर!

जीवन म्हणजे कला आहे
दुसऱ्यांना समजून घेण्याची
आयुष्यातले खाच-खळगे
आनंदाने पार करण्याची !

जीवन म्हणजे मौजमस्ती
खुप काही शिकणं
अनुभवाने वाकलेल्यांच्या पुढे
नम्रतेने झुकणं....!

जीवनात आहे आनंद
माणूस म्हणून जगण्यातला
वरिष्ठांशी थोरामोठ्यांशी
नम्रतेने वागण्यातला !

आयुष्याच्या वेलीवर
भावनांची फुले फुलतात
अपेक्षांचे हिंदोळे
प्रत्येकाच्याच मनात झुलतात!

करावा लागतो संघर्ष अनेकदा..
जीवन जगत असतांना
नाउमेद व्हावे लागते कधी
संधी समोर दिसतांना!

माणूस म्हणून जगण्यासाठी
खूप संयम हवा
तरच दिसतो चेहऱ्यावरती
यशाचा आनंद नवा!





श्रीम. राधिका भांडारकर
पुणे.

# जीवन.. असेही.. तसेही..

जीवन एक रंगभूमी
आपण सारे कलाकार
प्रत्येकाची वेगळी भूमीका
मागे अदृष्य  सूत्रधार.....

जीवनातले अनंत धागे
वस्त्र विणते सुखदु:खांचे
किती होते धावपळ
मनोरे बांधता स्वप्नांचे....

बुडतो स्पर्धेत तुलनेत
विचार नाही मीपलीकडचा
कशास जन्म मनुजा तुझा
पाही फोडुन तुकडा कोशाचा...

यशाने आनंद दिला
स्वप्नभंगाने उदास केले
अरे हा तर खेळ असे
फासे त्याचे दिले घेतले......

अनेक बेरजा वजाबाक्या
मात्र बाकी राहते शून्य
हे सारे उशीरा कळते
जेव्हां श्रींची इच्छा होते मान्य....

जगा आणि जगू द्या
व्हा करण्या काही आतुर
शेवटचा क्षण होई मधुर
असावांना येईल गहीवर.....






**श्रीम. संगीता महाजन**

जळगाव.


# जीवन.. असेही.. तसेही..

परमेश्वराने जीवनाचे
आपणास दिले वरदान
जन्म-मरते वेळी हाथ खाली
सार्थक करावे आपले जीवन...1

कशाला हवा लोभ मोह
अंहकार गर्व व्देष स्वार्थ
राग क्रोध सोडून करावे
सत्कर्म आपले सदा निस्वार्थ...2

सुंदर जीवन मिळाले ते
आनंदाने हसत जगावे
तुझे-माझे करूनी वेळ वाया
न घालता समाधानी राहावे ..3

सागरासारखे विशाल प्रेम हवं
आपुलकीचे मायेचे प्रेम द्यावं
प्रसन्न शांत मनी निर्मल राहावं
माणुसकीचे प्रेमळ  प्रेम घावं..4

परमेश्वराचे चिंतन स्मरण
चित्त चैतन्य एकाग्र  करूनी
ध्यानसाधनेने अंत:करणात
नम्रता,उत्साह शुध्द विचारानी..5

जीवन फुलासारखे सुगंधी
चोहबाजू व्यक्तिमत्वाने फुलूनी
आदर्श निर्माण करावे आपले
आनंद मिळेलच याच जीवनी ...6





**श्रीम. मनाली प्रदीप कोनकर**
पोस्ट पेण जिल्हा रायगड.

# जीवन.. असेही.. तसेही..

देवाकडून येऊन देवाकडे जाई पर्यंत च्या प्रवासाला
जीवन ऐसे नाव
आणि ह्या प्रवासासाठी लागणाऱ्या गाडीचे
नशीब ऐसे नाव
काहीचे आसन राखीव असते ह्या गाडीमध्ये
काही जण स्वतःला कोंबून चढतात या गाडीमध्ये
काही गुदमरतात काही ठेचकाळतात
काही प्रवासी तहानलेले काही खाऊन माजलेले
काहींचे जवळचे स्टेशन काहींचे लांबचे
ज्याची गाडी जोरात तो सुखवलेला
ज्याची गाडी बंद पडली तो दुखावलेला
परतीच तिकीट आधीच काढलेले असते
तुम्हाला हवे किवा नको
पण तिकीट सपेपर्तंत प्रवासाची सक्ती असते





**श्री. अरविंद कुळकर्णी**
मलकापूर

# जीवन.. असेही.. तसेही..

आनंद घ्यावा जगण्याचा
निश्चय केला पक्का मनोमन
एकदा आयुष्यात निघून गेला
पुन्हा येणार नाही तो क्षण

बरेच जीवन जगल्यावर
अर्थ जगण्याचा कळला
सर्व काही नश्वर पाहिल्यावर
पाय आध्यात्माकडे वळला

रिकाम्या हाताने येणे आणि
रिकाम्या हातानेच आहे जाणे
स्वार्थापलीकडे जावून काही
असावे दुसऱ्यासाठी जगणे

आनंद घ्यावा जगण्याचा
आप्त मित्र सोबत घेऊन
वाया घालवू नये काही क्षण
मग्न असावे कामात राहून

अर्थ जगण्याचा कळला
जगणे करूया अर्थपूर्ण
ठरलेल्या कोणत्याही गोष्टी
जीवनात न राहो अपूर्ण





**श्रीम. रेणुका पांचाळ**
तालुका वसमत, जिल्हा हिंगोली

# जीवन.. असेही.. तसेही..

जीवन सुंदर,सुंदर जीवन
आनंदाचे,फुललेले वन
सुंदर सुंदर,वेचायाला
तयार ठेवू,सदैव हे मन

सुंदर सारे, बघण्यासाठी
देले डोळे,परमेशाने
सुंदर गाणे,सुंदर गोष्टी
ऐकायाला,देली काने

सुंदर बोलू,सुंदर सांगू
सुंदर सुंदर विचार मांडू
जे जे आहे,उदात्त उत्तम
ते ते सारे,जगास देवू

सुंदर आहे,सारे काही
आम्हा तैसी,हवीय दृष्टी
विधात्यानेच,सुंदर सुंदर
जगण्यासाठी,निर्मिली सृष्टी

सुंदर जीवन,जगून घेऊ
सुंदर कामे,करून जाऊ
सुंदरतेचे,बी अंकुरता
सुंदर सुंदर,आपण होऊ





श्रीम. वैभवी मराठे
नाशिक.

# जीवन.. असेही.. तसेही..

जीवन म्हणजे संघर्ष,
सगळ्यांचं सारखच असतं...
मनातील दु:ख विसरून,
मृत्यूपुर्वी जगायचं असतं....

जीवन म्हणजे संघर्ष,
जीवनात झटायचं असतं....
केल्याने मिळत नाही,
हेच शिकायचं असतं....

जीवन म्हणजे संघर्ष,
जीवनभर धडपडायचं असतं..
स्वप्न पुर्ण करण्यासाठी,
नुसतंच जगायचं असतं....

जीवन म्हणजे संघर्ष,
त्याला सजवायचही असतं....
ओढ प्रेम विरह दु:ख,
शोधल्यावरच समजत असतं..

जीवन म्हणजे संघर्ष,
माणसासाठी वरदानच असतं..
सुख म्हणजे काय,
अनुभवातूनच मिळत असतं...





# जीवन.. असेही.. तसेही..

**श्रीम. अरुणा मुल्हेरकर**
अमेरिका.

अविरत वाहे जीवन सरिता
उगमापासुन सागरी मिळता
दिन सौख्याचे मौज मजेचे
कधी हसण्याचे कधी रडण्याचे.....

रोपापासून वृक्ष होतो
ऊन वारा सर्व साहतो
कितीही आले वादळ वारे
पांथस्थांना विसावा देतो......

असेच आहे मानव जीवन
टक्कर देई संघर्षाला
आयुष्यातील नाती जपुनी
घडवित राही व्यक्तित्वाला....

पिला पक्षिणी चारा देते
माय बालका स्तन्य पाजते
अनुभव घेता वात्सल्याचा
जीवन धन्य धन्य होते......

नाते असते नर नारीचे
प्रेमाने ते फुलत रहाते
नाते निर्मळ मैत्रीचे
घडवित राही जीवनाते.....

नाही जीवना कसली शाश्वती
आज असे तर उद्या नसे
यास्तव जीवन जगायचे
दोन घडीचा डाव असे.....






**श्रीम. शामला पंडित दीक्षित**

**प्रणाली प्रकाशन, चिंचवड.**


# जीवन.. असेही.. तसेही..

सूर जीवनाचा लागताच
लाभे  समृध्दी ऐश्वर्य सुख
सूर मारू संकटास असा
शोभे आश्चर्य चकित मुख ॥1॥

लय घेता अनोखी जीवनी
मधुरम सप्तसूर साज
लय नको अट्टहास असा
ताळमेळ घाल राख बाज ॥2॥

काळ येतो जातो परतून
धैर्य शौर्याचा वाजतो गाज
काळ सत्कर्म सद्भावनेत
कार्यकर्तृत्त्वाचा वाढे नाज ॥3॥

आस लागते परमार्थाची
आराधना प्रार्थनेचा ध्यास
आस जोडणारा मनाला
गुंतता स्वयं करी अभ्यास ॥4॥

हार अपसूक पचविता
नावलौकिक मिळतो मान
हार तुरे लाभे पदोपदी
आयुष्य मग सुवर्णपान॥5॥

**शब्दार्थ**

सूर= आवाज , पाण्यात पोहणे
लय = ताल , खूप
काळ= मृत्यू , वेळ
आस= इच्छा , चाकांचा कणा
हार = पराभव , फुलांची माळ





# जीवन.. असेही.. तसेही..

श्रीम. श्रद्धा शि खानापूरकर
ठाणे.

जीवनाच्या प्रत्येक क्षणामधून
दिसे भावनांची ओल
भावनांना त्या जपाया
जीवन आहे अनमोल

सासर,माहेर नाती एक होण्या
असावा समजुतदार तोल
जपलेल्या नात्यास आणाया
जीवन आहे अनमोल

हास्यामधे सदा बसतो
डोह आनंदाचा खोल
सौख्य बेधुंद उधळाया
जीवन आहे अनमोल

शब्दामधून गुंफत जाते
आपले प्रेमाचे सारे बोल
गैरसमज दूर करायला
जीवन आहे अनमोल

नयनाच्या पाकळी वर
झुलतो आठवांचा डौल
दृश्य मैत्रीचे फुलवया
जीवन आहे अनमोल





**श्रीम. सरोज सुरेश गाजरे**

भाईंदर.

# जीवन.. असेही.. तसेही..

जीवनाच्या रंगमंची
दिसे सुखदुःख जाळे
कर्तव्याच्या दोरीसंग
हास्यफुले माळ माळे //1//

प्रत्येकच नात्यांमध्ये
असे भावनांची ओल
पापणीच्या काठावर
आनंदाश्रू मोल खोल //2//

मनांगणी जगण्याचा
असे आठवांचा सोल
मैत्र नाते फुलवाया
जिव्हाळ्याचे सूत्र बोल //3//

आयुष्याच्या रणांगणी
कधी दुःख वार पेलू
कधी यातनांची कडी
आनंदाचे क्षण झेलू //4//

शुद्ध भाव देशहित
दिप गल्लीत पेटवू
करू दुखाश्रूंची चोरी
दीन मुखी हर्ष पेरू //5//

नाही जीवाची शाश्वती
करू थोडेसे सत्कर्म
पैसा , सत्ता राही इथं
जाणू जीवनाचे मर्म //6//





# जीवन.. असेही.. तसेही..


कु. प्रणिती संजय अवताडे
विरवडे(बु||.) ता.मोहोळ,
जि.सोलापूर..


जीवनात मज अनोळखी कुठे भेटले ?
मुखवटे काही आपल्यांचेच काळाने उठले!

स्वप्नात जरी घर माझे फुलांनी सजले,
वास्तवात शाबित ठेवण्यास मी किती थजले..!

मिळालेही असेल जरी सुख काही काही,
का तरी मज भासले दुःख बारमाही ?

जीवनाचा हा असा कसा विनोद झाला ?
हसायचे ठरवले अन् हुंदकाच मज आला..!

न जाणो, किती प्रश्न केले मी जीवनाला!
कळले न झाले असे काय त्या उत्तराला...

जीवना कधीही मी न केले मान्य तगणे,
एवढे जगूनही मज जमले न जगणे..!






**श्रीम. शरयू पाम्पट्टीवार**

**दिग्रस, यवतमाळ**


# जीवन.. असेही.. तसेही..

जीवन एक संघर्ष असते..
कधी हार कधी जीत असते...

इथे नेहमीच असते परिक्षा..
कधी बक्षिस तर कधी शिक्षा...

संघर्ष कुणाला नाही चुकला
माणूस काय देवही मुकला ...

सितेनेही दिली अग्निपरिक्षा...
आपणच करा आपली रक्षा...

सुर्याचाही उदयोस्तव होतो अस्त...
म्हणून काय नभोमंडल होई अस्ताव्यस्त?...

गुलाबाला संगत काटयांची...
त्यातच रंगत सौंदर्याची...

सागराला आस भरतीची...
नसे भिती ओहोटीची....

जीवन खेळी सुख दुःखांची
जपणार्या खर्या नात्यांची...

जीवन ऊन सावलीचा खेळ...
आंबट गोड मनांचा मेळ....

हिर्याला संगत कोळश्याची....
किंमत मात्र लाखमोलाची ......

इथे मरण अटळ असते
मग काय जगायचेच नसते

निःस्वार्थ मनाने कर्म करा..
वाहेल खळखळ जीवन झरा...



# जीवन.. असेही.. तसेही..



**श्रीम. अंजली उत्तरवार**
गितांजलीज् पोएट्री,
चंद्रपूर

जीवनाच्या झाडावर असू द्यावे आनंदाचे घरटे
समाधानाचा ठेवा त्यात असू द्यावा
वात्सल्याचे खत पाणी त्याला देत रहावे
पक्षांचाही किलबिलाट नित्य असू द्यावा

फळण्या-फुलण्यासाठी त्याच्या
त्यागावे षडरिपूंना, उपेक्षांना....

कामातूर असावे
परोपकारामध्ये, छंदामध्ये,कर्तव्यामध्ये

क्रोध येऊ द्यावा
अन्यायाचा, अनितीचा, खोटेपणाचा

मत्सर करावा
अहंकाराचा , स्वार्थीपणाचा, नैराश्याचा

लोभ करावा
ईश्वराचा, वात्सल्याचा, मदतीचा
मोह येऊ द्यावा सत्प्रवृत्तींचा,
परमानंदाचा, आव्हानांचा

असा जोपासलेला हा वटवृक्ष
नक्कीच होईल कल्पवृक्ष... कल्पवृक्ष





**श्रीम. अर्चना सुनिल घळके**
बार्शी, सोलापूर

# जीवन.. असेही.. तसेही..

पाहता क्षणी आवडी मनी हेच आहे जीवन ॥धृ॥

जीवनाच्या वाटेवर
असतात खुप काटे
त्यावरुनी चालताना
नकोसेच वाटे
त्यातच असते एखादी
मधुर कळी
मगच उमलते
आयुष्याची पाकळी
पाहता क्षणी आवडी मनी हेच आहे जीवन ॥1॥

जीवनाच्या गीतामध्ये
असते मधुर गोडी
पण कराव्या लागतात तिथे
खुपच तडजोडी
जर नकोसेच झाले जीवन
तर मग येतही नाही मरण
पाहता क्षणी आवडी मनी हेच आहे जीवन ॥2॥






कु. सुप्रिया गोटेकर
अकोला.


# जीवन.. असेही.. तसेही..

जीवन असेही आनंदाचा सूर
जीवन तसेही कधी क्षणभंगुर
जीवन असेही खळखळणारा ओढा
जीवन तसेही उतरती कडा

जीवन असेही टवटवीत फुलाप्रमाणे
जीवन तसेही सुकलेल्या पाकळीप्रमाणे
जीवन असेही तटस्थ किनारा
जीवन तसेही कधीकधी वाजतात बारा

जीवन असेही जेव्हा-जेव्हा चांगले आहे
जीवन तसेही जेव्हा-जेव्हा खडतर आहे
जीवन असेही सुखाचा मार्ग आहे
जीवन तसेही दुःखाची पौलवाट आहे

जीवन असेही तेजोमय आहे
जीवन तसेही अंधकार आहे
जीवन असेही स्वावलंबी आहे
जीवन तसेही परावलंबी आहे

जीवन असेही प्रफुल्लित आहे
जीवन तसेही निरागस आहे
जीवन असेही पक्षाप्रमाणे आहे
जीवन तसेही पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणे आहे

जीवन हे असेही वाटते काहीतरी चांगले करावे
जीवन हे तसेही वाटते सर्वकाही हरवूनी जावे
जीवन हे असेही सुख पाहता जवापाडे
जीवन हे तसेही दुःख पर्वताएवढे



# जीवन.. असेही.. तसेही..



**कु. सौरभ हिरामण आहेर**
तिसगाव, नाशिक.

हा प्रवास दुरचा आहे
हे थकलेत माझे पाय ...
सांगा कुणी जरासे
हे जीवन म्हणजे काय ...

वाट चुकलो होतो मी
तरीही रस्ता चालतं जायं
अजुन अर्थ उमगला नायं
हे जीवन म्हणजे काय..

गर्द अंधार दाटला पुन्हा
उरला नाही तरणोपाय ...
आसवांनाही प्रश्न केला
हे जीवन म्हणजे काय..

ऊन सावलीचा खेळ ,
सुख दुःखाचा मेळ हायं ..
आता कळले आहे मला
हे जीवन म्हणजे काय..






**श्री. विशाल एस. नवले**

शिवकुमार

रा.नांदुरा जि.बुलढाणा.


# जीवन.. असेही.. तसेही..

काय लिहावे जीवना
सांग तुझ्यावर आता
कशी सांगावी जगाला ;
मनातील दुःख कथा ॥1॥

जीवनाच्या प्रवासात
दुःख काटे टोचतात
आशा आकांशाचे इथे
दीप बघा विझतात ॥2॥

मनी योजलेली गोष्ट
होत नाही कधी सत्य
माणसांच्या बाजारात
जाई विकल्या असत्य ॥3॥

झाले कठीण जगणे
किती मरण ते स्वस्थ
दुःख झळा देण्यासाठी ;
काळ झाला बघा व्यस्त ॥4॥

सारे इथं कठपुतली
असे मनुष्य लाचार
किती झेलायचे पाठी ;
दुःख वेदनेचे वार ॥5॥

नाही राहो मनी खंत
नांदो जीवनी आनंद
पुन्हा सुटावा जीवनी
सुख कस्तुरिचा गंध ॥6॥





कु. सरस्वती महादेव कारंडे
सोलापूर.

# जीवन.. असेही.. तसेही..

जेव्हा जन्म घेतला मी तुझ्या पोटी
तेव्हा तु म्हणलास पहली बेटी धनाची पेटी
तेव्हा झाल्या खुप लगबगी
जन्मले मी नि सार्या गावात वाटली तु जिलेबी
झाले मी मोठी , झाले मी मोठी
मग का ठरली बाबा,भविष्यवाणी तुझी खोटी
अस म्हणतात की मुलगा, मुलगी एकसमान
दोघांनाही सारखाच मान
मग तू म्हणतोस की मुलगा माझी शान

बाबा अशी काय झाली चूक
मला पाहताच का हरपली तुझी तहान भुक
बाबा तु म्हणतो , आनंदाने मुलगा आहे माझा वंश
मग मी पण आहे ना तुझाच अंश
बाबा, करू नको तू माझा धिक्कार
मला पण आहे स्वातंत्र्यपणे जगण्याचा अधिकार
जेव्हा होत गेले मी मोठी
तेव्हा लागली माझी जगण्याची कसोटी
आणि बदलल् तुझ मन नि तुला वाटू लागल
पोरगी म्हणजे, परक्याच धन

बाबा, अशी काय मी चूक केली
आणि तू म्हणालास,
अशी कशी तु माझ्या नशिबा आली
लोक म्हणतात,
मुलगा माझा वंशाचा दिवा मग मी ही
त्या दिव्याची वात आहे
आणि तू म्हणतो की ही तर मुलीची जात आहे





**श्रीम. सोनाली जगताप**
मुंबई (वांद्रे)

# जीवन.. असेही.. तसेही..

सुख आनंद पसरवण्या
सनित्य ठेविले स्मित गालावर
अश्रू दाटलेत अनेक वेळा
विरलेत नयनांच्या सागरावर...

धर्म कर्तव्य नेटकेपणाने
पार करण्यात आयुष्य झटले
काटे अनेकवेळा  सोसले
तरी कुणा कसे ना पटले...

देह असे हा क्षणभंगुर
होते राखरांगोळी दोन चीमट्यांची
बोल मधुर देउन जावेत
हृदयात रहातील आठवणींची...

असावेत जीवन सद्विचारांचे
निरर्थक नको अविवेकी पणाचे
प्रेमात राम रमतो निरंतर
मोल समजावे त्या नामाचे...

क्षणोक्षणी बदलते हे जीवन
आज आहे ते उद्या नसेल तरीपण
योग्य वेळेची कदर करावी
हे सूत्र जाणून घ्या सोडूनी मीपण...





**श्रीम. सविता मुनोत**
कुकाणा, अ. नगर

# जीवन.. असेही.. तसेही..

जीवन एक परीक्षा आहे
जीवन आहे एक संघर्ष
जीवन हार जीत आहे,
जीवन कधी उन तर कधी सावली
जीवन आहे एक अग्निपरीक्षा
जीवन सुंदर आणि अनमोल आहे
जीवन आहे एक पराकाष्ठा
जीवन जगणे आहे कला
जीवन संस्कारांची शिदोरी आहे ,
जीवन अनमोल आहे, भरभरून जगा
जीवन क्षणभंगूर आहे
जीवन आहे एक नाण्याचा दोन बाजु
जीवन आहे एक लपंडाव
जीवन धर्ममय आहे
जीवन संगित आहे
जीवन स्वप्नं आहे
जीवन ध्येय आहे ध्येयवेड बना
जीवनात नेहमी पुढे जा
जीवनात कधीच मागे वळू नका
जीवन परत नाही मिळणार





कु.भाग्या पांडुरंग कारंडे लक्ष्मी
भाग्यलेखा,
सोलापूर.

# जीवन.. असेही.. तसेही..

किती निखारे पेटले दु:खीताचे
किती सोसले निखारे जीवनाचे
कोडे काही सुटेना आयुष्याचे
रूप आले धगधगत्या मशालीचे

दरीत कोसळणार्या प्रत्येक अश्रुंचे
किती सोसले चटके उन्हाच्या प्रहराचे
डगमगले मन चुकलेल्या वाटेने
आयुष्याचे गणित सुटत नाही अर्ध्याने

वाटले जगावे अज्ञात वासातले जीवन
ऐकायला तयार नव्हते कधीच मन
कितीही सोसले चटके जीवनाचे
दु:खी नाते जोडले आहे अंतर्मनाचे

हाक ऐकली होती ध्येयवेड्या मनाची
वाटचाल सुरू आहे काटेरी वळणाची
साथ आहे रक्ताळलेल्या पावलांची
इच्छा आहे ध्येयाचं शिखर गाठण्याची

जिद्द आहे दरीत कोसळलेल्या मनाची
ध्येयाने पछाडलेल्या आत्मविश्वासाची
थांबले मी,पण संपले नाही सांग वेड्या
तुझ्या तुच मनाला,ध्येयवेड्या गगनाला

मार्ग सुटला तरी गणित सुटणार नाही
जीवनखेळ सतरंजावर सुटणार नाही
उतरावे लागते युद्धाच्या रणांगणात
शोध सुखाचा घ्यावा लागतो जीवनात





**कु. मल्हारी राख**

**शेवगाव, अहमदनगर.**

# जीवन.. असेही.. तसेही..

जीवन हा एक
असतो खडतर प्रवास..
या प्रवासात लाभतो
अनेकांचा सुखद सहवास..

येता जीवनात
कधी कुठली नोबत..
कोणी घेतं मजा
तर कोणी उभा राहतं सोबत..

जीवन असतं लाखो
अनुभवांची मोठी शिदोरी..
कधी कधी दुःखाची गर्दी
तर बऱ्याचदा सुख जातं चोरी..

जीवन लक्ष्य असावं ध्यानी
अन त्याला अचूक टिपावं..
जाणाऱ्याला जावू द्यावं
सोबत्याला मात्र अलवार जपावं..

जीवन म्हणजे असतं
सुख दुःखाचा सागर खोल..
हसत हसत जगावं
कारण जीवन असतं अनमोल..





**श्रीम. रेखा बागुल**
बोईसर, जिल्हा-पालघर

# जीवन.. असेही.. तसेही..

आव्हान, साहस,त्याग
जीवनाची आहे कसोटी
सुखदुःखाच्या नौकेची
ही आहे मोठी साचोटी

विधिलिखित आहे जन्ममृत्यू
तरी जीवन घडवायचे आपण
प्रेम ,भाव, स्मितहास्य करून
सकारात्मक रहा सर्वजण

छान सजवायचे जीवन
प्रेम ,त्याग आपुलकीने
मातृत्व ,समाज,धरतीचे
ऋण फेडू ऋणानुबंधाने

क्षणभंगुर हे जीवन
मोहात नाही पडायचे
पुण्य सत्कर्म करून
अस्तित्व जपायचे





**श्रीम. अस्मिता कुलकर्णी**
अमेरिका

# जीवन.. असेही.. तसेही..

प्रत्येकाचं जीवन, एक सुंदर गाणं असावं...
आपल्याच अवखळ शब्दात,
ते अगदी सहज मांडावं,
स्वतःच्या स्वरातच पण,
स्वच्छंदपणे गुणगुणावं,
प्रत्येकाचं जीवन, एक सुंदर गाणं असावं...

तालासुरांसारखंच नात्यांना,
कसं हळुवार जपावं,
नात्यांच्या सोबतीनेच,
ते अगदी सुरेल रंगवावं,
प्रत्येकाचं जीवन, एक सुंदर गाणं असावं...

सुख दुःखाच्या मैफिलीत,
कधीतरी हरवून जावं,
मनाला साद घालत,
भान हरपून गात रहावं,
प्रत्येकाचं जीवन, एक सुंदर गाणं असावं...

तक्रार असली तरी, लयबद्ध असावं,
माघार घेतली कधी तरी, स्थितप्रज्ञ असावं,
गुणगुणता येईल सर्वांबरोबर,
असं सहज सोप्पंही दिसावं,
प्रत्येकाचं जीवन, एक सुंदर गाणं असावं...

मग कधीतरी शांत बसून,
आपल्यालाच ऐकावं,
पुढचे स्वर हसरेच लागू दे रे,
मागणं एकच असावं,
प्रत्येकाचं जीवन, एक सुंदर गाणं असावं...





# जीवन.. असेही.. तसेही..

श्रीम. मनिषा दिपक सामनेरकर
पालघर

अजून किती दिवस
माझं माझं करणार
खाली हात आला
खाली हात जाणार

आता तरी मनुजा
सोड हा अंहकार
माणूसकीचा घाल
आता नवा अलंकार

सुखाच्या श्रावणसरीत
दुखाची लागेल झळ
मन कठोर करून
सोस जरा तू कळ

नात्यात नको आणू
कधी मतलबी दुरावा
आपलेपणा आपुलकीचा
नेहमीच असावा पुरावा

क्षणभंगुर जीवनाचा
क्षणक्षण आनंदाने उपभोग
जोपर्यंत श्वासात श्वास
तोपर्यंत उत्साहाने जग





# जीवन.. असेही.. तसेही..

**श्रीम. दिपाली दिलीप पिंपळे**
पालघर

जीवनाचा आनंद घेत घेत
अर्थ त्याचा जाणायचा
जगायला मिळेल तो
क्षण फक्त आपला मानायचा

जसा तूम्हाला आहे गरजेचा
तसा व्हा ना कुणाचा तरी आधार
कार्य करा असं तुम्हांविना
सगळं जग होईल निराधार

चढउतार येतीलच जीवनात
घाबरून मागे नाही सरायचं
मरणानंतरसुध्दा लोकांच्या ह्रदयात
सुंदर आठवणीतून उरायचं

जीवन देवाचे दान आहे
फक्त या गोष्टीवरच ठेवा विश्वास
आपल्या हातात काहीच नाही
घेण्याशिवाय आपला श्वास

दुसऱ्यांना जीवनदान देणं
एवढं तरी सत्कार्य हातून घडावे
मरणानंतर कुणाच्यातरी डोळ्यांतून
आपल्यासाठी दोन अश्रू पडावे





**श्री. कवी सरकार इंगळी**
ता हातकणंगले, जि कोल्हापूर

# जीवन.. असेही.. तसेही..

लाखमोलाचं जीवन माणसा
असेही तसेही जगायचचं
हार जीत असते आयुष्यात
मात्र नाही कधीच खचायचं ......।।1।।

जगण्याची एक वाट असे
काटे कुटे कधी फुलांचा खचं
वेडीवाकडी कधी सरळ असे
करीत मात त्यावर जगायचं......।।2।।

कर्म चांगल करीत रहावे
धनी खरे तुम्हीचं यशाचं
पाप पुण्यांचा तर मांडावे
हेचं गणित आहे जगण्याचं..........।।3।।

चढ उतार खूप सोसले
जगताना सुख दुःखाचं
कधी हिंमत ना हरले
गाठले शिखर नव्या यशाचं.......।।4।।

एक ध्यास मनी असावा
जिद्ध,प्रयंत,धाडस,एकचं
संघर्ष जगण्यासाठी करावा
मनी सुंदर जीवन जगायचं.......।।5।।





# जीवन.. असेही.. तसेही..

**कु. भाग्यश्री संतोषराव वायरे**
**वर्धा.**

जीवन जगतांना
इतक धुंद व्हावं लागत
दुःखाचा रस्ता असूनही
त्यावरून हसत चालायचं असतं

मागे वळून पाहायचं असतं पण...
मनाला दुखी करायचं नसतं...!

भरलेले डोळे पुसत..
आशेचा किरण शोधायचा असतो...

मागे वळून पहाताना
समोर किती आलो...
याचा विचार करायचा असतो..!!

दुःख हा जीवनाचा भाग आहे
त्याला धरून बसायचं नसतं...!

हाताच्या मुठीने आसमंत नापायचा असतो.
दुःखाला विसरायचं असतं.
जीवन कसं असतं..???
जीवन असं असतं...!!!





# जीवन.. असेही.. तसेही..

**श्री. साहेबराव पवार**
**नाशिक.**

आदिवासी आम्ही पोऱ्या
भाषा कोकणी बोलजं
ऱ्हाजं वडोंगरदऱ्या मं
घाटबिट रे चालजं

आयां लुगडां पोलका
त्येला दहा रे ठिगळा
बाबां धोतीर फाटका
तरी बदिसला बगळा

बाबा जूपं तो कडांगा
त्येमं नांगर वखर
काळ्या गोऱ्या बैलजोडी
बाबा नांगर वावरं

डोक्यावरं तो डालखा
त्येमं नागली भाकर
लाव्हं लाव्हं चालं धर
एक हातमं दुशेर

बलगुत्या मं आऊत
करं सपाट वावरं
भात ढोंगी ढोंगी लावा
आया आणिक वं पोरं

घामं वावरं मं गळं
घरं तवं चूला पेटं
आया घरटीला दळं
भरं आम्हांना वं पोटं






**श्री. प्रसाद धुमाळ**
प्रसादिक
वाई, सातारा


# जीवन.. असेही.. तसेही..

तुला झेलणे.. मला भाग आहे..
तुझ्या जीवना.. मनी राग आहे..

सदा उध्वस्त.. माझी स्वप्नं का रे,
ही फुललेली.. तूझी बाग आहे..

हवी सावली.. नको ऊन माथी,
निखाऱ्यासम.. तुझी आग आहे..

किती लाड केले.. हवे ते दिले,
विष ओकणारा.. तू नाग आहे..

झाकले कितीदा.. मी दोष सारे,
कपाळी का रे.. तूझा डाग आहे..

झोपला असा.. उठलाच नाही,
या कुंभकर्णा.. कधी जाग आहे..

तुझ्या जीवना.. छळ थांबेल का,
सोड.. तुला कुठे दिमाग आहे..?





**श्री. माणिक उ.सोनवणे**

**रा. ता. सोयगाव , जि. औरंगाबाद**

# जीवन.. असेही.. तसेही..

जीव देहामंधी येता ,
स्पंद होते वाटसरू ...!
पाय पडता भुईला ,
होते जीवन ते सुरू ...!!

श्वास देहाचा सलगी ,
दोघे सवंगडी खास ...!
पाठी सुख दुःख घेत ,
निघे पल्लाचा प्रवास ...!!

वाट खंतडाची मोड ,
दोन पायाने चालती ...!
ठेस लागती बोटाला ,
अश्रू पापणीत येती ...!!

गाठे गोतावळा सारा ,
भेटी जीवनाच्या वाटे ...!
अचानक प्रवासात ,
मारे एक एक मुटे ...!!

लय दूरचा प्रवास ,
अर्ध्या मंधीच सुटतो ...!
थाटलेला तो बाजार ,
एका क्षणात उठतो ...!!

जीवनाच्या प्रवासात ,
जीव एकटाच जातो ..!
सारे नाते गोते गोत्र ,
पाठी मागेच ठेवितो ...!!



# जीवन.. असेही.. तसेही..



कु. सिद्धेश राजाराम पाटील
कोल्हापूर.

जीवन एक प्रवास आहे
आयुष्य म्हणजे लालपरी,
जिथून नेईल ड्राईव्हर
तीच आयुष्याची वाट खरी..

ड्राइव्हर म्हणजे आत्मा
आणि कंडकटर हे मन,
प्रवास घडतो तेव्हाच
जेव्हा एकत्र असतील दोघेजण..

मुख ड्राइव्हर खोली
फक्त खडाखड वाजे,
चंचल मन कंडकटर
साऱ्या एसटीत गाजे..

शेजारचा प्रवासी हा
आपलाच नातेवाईक,
आपली विचारपूस करण्या
जग नसे पाईक..

इतर प्रवासी मिळून
बनतात सभोवतालचे जग,
प्रत्येक स्टॉप वर उतरून
चढवतात अनुभवांची रग..

मन सुचवते आत्म्याला
आणि देह जगण्यातून जागतो,
शेवटचा स्टॉप आल्यावर
हा देह ही एकदिवस सोडावा लागतो..





**श्री. प्रथमेश तायडे**
खारघर, नवीमुंबई

# जीवन.. असेही.. तसेही..

कधी हसवते कधी रडवते
कधी पाडते कधी सावरते
अशी ही जीवनाची शाळा
कधी घडवते कधी बिघडवते

हास्यात दडलेल दुःख दाखवते
दुःखात सोबतीचा हात देते
मार्गात जरी आली कधी अडथळे
तर बळ देऊन यशाची वाट दाखवते

कधी एकांतात ही साथ देते
कधी गर्दीत ही हात सोडते
कधी पडलो काळोखात
तर ती प्रकाशाची वाट दाखवते

अपल्यांमधल्या परका दाखवते
परक्या मधील आपुलकी दाखवते
माझ्यातला मी कधी हरवलो
तर मला स्वतःशीच भेटवते

अशी ही जीवनाची शाळा
एका क्षणात सर्वकाही शिकवते



We Create

# IDEAS

for You...




Prasad Dhumal - 8097302653

## SERVICES

- Logo Designing
- Letterheads
- Flex Vinyl Board
- Wedding Album
- 3D Visualization
- Visiting Cards
- Pamplates
- Catalogs
- Photo Editing
- Exhibition Stall
- Corporate gifting and many more....



**Grow Your Business with us**